<u>नियतकालिक बदल्या-सन २०२३</u>
**सहायक संचालक (तांत्रिक), तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक: बदली-२०२३/(प्र.क्र.७६/२३)/तांशि-१**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ०६ जुलै, २०२३

**<u>शासन आदेश</u> :**

"महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५" मधील तरतुदींनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने **सहायक संचालक (तांत्रिक), महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशासकीय सेवा,गट-अ** या संवर्गातील अधिका-यांच्या बदल्या खालीलप्रमाणे करण्यात येत आहेत. बदलीनंतर संबंधित अधिका-यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोरील स्तंभ-३ येथे दर्शविलेल्या ठिकाणी करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकारी यांचे नाव व कार्यरत संस्था | बदलीचे ठिकाण | बदलीचा प्रकार |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| सहायक संचालक (तांत्रिक), गट-अ | | | |
| १ | श्रीमती वर्षा संदीप गुजरे,<br>तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई. | तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, पुणे. | विनंती |

२. सदर बदली आदेश तात्काळ अंमलात येतील.

३. उपरोक्त अधिका-यांना शासन नियमानुसार पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहणार नाही.

४. सदर बदली आदेशाची प्रभावीपणे अंमलबजावणी होणे गरजेचे असल्यामुळे बदली झालेल्या अधिका-यांना संबंधित कार्यालय प्रमुखांनी तात्काळ कार्यमुक्त करावे. बदली झालेल्या अधिकाऱ्यांस कार्यमुक्त करण्याची जबाबदारी वैयक्तिकरीत्या संबंधित सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय यांची राहील.

५. बदली झालेले अधिकारी कार्यमुक्त होऊन रुजू होण्यासाठी आल्यानंतर त्यांना विनाविलंब रुजू करुन घ्यावे. एखाद्या अधिका-यास रुजू करुन न घेतल्यामुळे काम न करता वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधित अधिकारी यांना जबाबदार धरण्यात येईल.

६. प्रस्तुत आदेशाची अंमलबजावणी प्रभावीपणे होण्याकरिता संबंधित सहसंचालक, विभागीय तंत्रशिक्षण कार्यालय यांनी पाठपुरावा करावा. तसेच, याबाबतचा कार्यपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून १५ दिवसांच्या आत संचालक, तंत्रशिक्षण यांचेमार्फत शासनास सादर करावा.

७. बदली झालेल्या अधिका-यांची कोणतीही रजा शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय मंजूर करण्यात येऊ नये.

८. सदर बदल्यांचे आदेश निर्गमित झाल्यानंतर महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमानुसार

दिलेल्या पदग्रहण अवधीत, संबंधित अध्यापकांनी बदलीच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७०६१९१२५६३१०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PAGARE SHRIKRISHNA KASHINATH

Digitally signed by PAGARE SHRIKRISHNA KASHINATH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=cc78d6dbb4fe0c3d5473ed374dc1007ae7db08a8a6ca9468ce2a8aae16c0cb06, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4E8BC157609C105D396B04018FA47F8909333AFC18DDC3893CC043F18F759C0B, cn=PAGARE SHRIKRISHNA KASHINATH
Date: 2023.07.06 19:14:10 +05'30'

**( श्रीकृष्ण पगारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित अधिकारी (संस्था प्रमुखामार्फत)

**प्रत,**

१) मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई.
२) मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई.
३) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) सर्व सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालये (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत)
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षक) मुंबई / नागपूर, महाराष्ट्र १ /२.
६) प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
७) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत)
८) निवड नस्ती - तांशि -१.